भुजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था नोंदणीसाठी सुधारित धोरण तयार करण्याच्या अनुषंगाने अंतिम निर्णय घेण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या समितीमध्ये मा.श्री. आशिष जयस्वाल यांचा समावेश सदस्य म्हणुन करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन पुरकपत्र क्र. मत्स्यवि-२०१६प्र.क्र. १७१ ( भाग-३) /पदुम-१३**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मत्स्यवि-२०१६ /प्र.क्र.१७१ (भाग-३)/पदुम१३, दि. १६ जुन, २०२३.

**प्रस्तावना :-**

भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था संघ नोंदणीबाबत सर्वसमावेशक अशा स्वरुपाचे नवीन धोरण करण्याकरिता शासनास शिफ़ारशी सादर करण्यासाठी मच्छिमार संघटनामधील प्रतिनिधींची समिती श्री. विवेक दिनकर जुगादे यांच्या अध्यक्षतेखालील संदर्भाधीन दि. १६ जून, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये ३० सदस्यांची समिती गठीत करण्यात आली आहे. प्रस्तुत समितीने केलेल्या शिफ़ारशीवर अंतिम निर्णय घेण्यासाठी मा.मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. मा.मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखालील समितीमध्ये मा.श्री. आशिष जयस्वाल, विधानसभा सदस्य यांचा समावेश सदस्य म्हणुन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन पूरकपत्र :-**

या शासन पूरकपत्रान्वये वाचा क्र. ३ अन्वये श्री. विवेक दिनकर जुगादे यांच्या अध्यक्षतेखालील समितीने केलेल्या शिफ़ारशीवर अंतिम निर्णय घेण्यासाठी मा.मंत्री (मत्स्यव्यवसाय ) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आलेल्या समितीमध्ये मा.श्री. आशिष जयस्वाल यांचा समावेश सदस्य म्हणुन करण्यात येत आहे.

सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२४११५०३१४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

ASHWINI ASHOK JADHAV

Digitally signed by ASHWINI ASHOK JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=c807b0e8d8360e19331860b4841f75c14643d6bf9b74326a4baa3f7d6efd259c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=83E5AC89022C52D6BBCAD9FB1DAD058861F7638C5245D0B5FF225C0CEEC3E64B, cn=ASHWINI ASHOK JADHAV
Date: 2023.08.24 11:53:02 +05'30'

**( आश्विनी जाधव )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (मत्स्यव्यवसाय ) यांचे खाजगी सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (मस्त्यव्यवसाय ) यांचे स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई.
५. मा.श्री. आशिष जयस्वाल, राजाजी वार्ड, रामटेक ता- रामटेक जि. नागपूर
६. निवडनस्ती (पदुम-१३).